**महाराष्ट्र लोकसेवा हक्क अध्यादेश-२०१५ अंतर्गत लोकसेवा, नियत कालमर्यादा, पदनिर्देशित अधिकारी, प्रथम व व्दितीय अपिलीय अधिकारी प्रसिध्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक संकिर्ण २०१५/प्र.क्र. १२/कामगार ९**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : २४ जुलै, २०१५.

**वाचा** : सन २०१५ चा महाराष्ट्र अध्यादेश क्र. ५ दिनांक २८/०४/२०१५

**प्रस्तावना :-**

राज्यातील पात्र व्यक्तिंना पारदर्शक, कार्यक्षम व समयोचित लोकसेवा देण्याकरिता तसेच लोकांच्या स्थानिक प्रशासनाकडून वाढत्या अपेक्षा विचारात घेवून त्यांना तत्पर व दर्जेदार सेवा पुरविण्याच्या दृष्टीकोनातून महाराष्ट्र लोकसेवा हक्क अध्यादेश-२०१५ दिनांक २८/०४/२०१५ रोजी महाराष्ट्र राज्यात लागू करण्यात आला आहे. या अध्यादेशातील कलम ३ मध्ये नमूद करण्यात आल्यानुसार प्रत्येक सार्वजनिक प्राधिकरणाने अध्यादेश लागू झाल्यानंतर ३ महिन्यांच्या कालावधीच्या आत व त्यानंतर वेळोवेळी ते पुरवित असलेल्या लोकसेवा पदनिर्देशित अधिकारी, प्रथम व व्दितीय अपिलीय अधिकारी आणि नियत कालमर्यादा या अध्यादेशाखाली अधिसूचीत करणे आवश्यक आहे. सदरहू अध्यादेश निर्गमित करण्यामागे सार्वजनिक प्राधिकरणाने त्या पुरवित असलेल्या सेवा अधिनियमांतर्गत प्रसिध्द करुन त्याप्रमाणे संबंधित सेवा पुरविणे आवश्यक आहे.

या विभागाच्या प्रशासकीय अधिपत्याखालील कामगार आयुक्तालय व बाष्पके संचालनालयामार्फत विविध सेवा सुविधां पुरविण्यात येतात त्यापैकी ज्या सेवा महत्वाच्या आहेत, अशा सेवा उक्त अध्यादेशाच्या कलम ३ नुसार अधिसूचीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्या अनुषंगाने शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

१. या शासन निर्णयाच्या परिशिष्ट - अ मध्ये नमूद केलेल्या एकूण ८ सेवा आयुक्त, कामगार आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य मुंबई यांच्या कार्यालयामार्फत उक्त अध्यादेशाच्या कलम ३ नुसार अधिसुचित करावयाच्या आहेत.

२. या शासन निर्णयाच्या परिशिष्ट - ब मध्ये नमूद केलेल्या एकूण २ सेवा संचालक, बाष्पके संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई यांच्या कार्यालयामार्फत उक्त अध्यादेशाच्या कलम ३ नुसार अधिसुचित करावयाच्या आहेत.

३. या अधिनियमांतर्गत सेवा पुरविण्याकरीता आकारावयाची फी निश्चित करण्याची संबंधीत आयुक्त/ संचालक यांना मूभा राहिल. तसेच संबंधित कार्यालयाची रचना विचारात घेवून पदनिर्देशित अधिकारी, प्रथम अपिलीय अधिकारी व व्दितीय अपिलीय अधिकारी इत्यादीमध्ये संबंधित आयुक्त/संचालकांना सुधारणा करता येईल.

४. आयुक्त, कामगार व संचालक, बाष्पके यांनी त्यांच्यामार्फत पुरविण्यात येणाऱ्या लोक सेवांची सूची, नियत कालमर्यादा, अर्जाचा विहीत नमुना, फी, पदनिर्देशित अधिकारी, प्रथम व व्दितीय अपिलीय अधिकारी यांचा तपशिल कार्यालयाच्या सूचना फलकावर तसेच त्यांच्या संकेतस्थळावर किंवा पोर्टल वर प्रदर्शित करावा.

५. आयुक्त, कामगार व संचालक, बाष्पके यांनी उपरोक्त प्रमाणे उक्त अधिनियमाच्या कलम ३ नुसार सेवा अधिसूचीत करणे व त्याची अंमलबजावणी करण्याची कार्यवाही तात्काळ करावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२४१६३३३४८७१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha M Bharose

Digitally signed by Varsha M Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1bd844032884bbf2167bc99cd85325223aceef69d02bd455b7ca6972491623e0, cn=Varsha M Bharose
Date: 2015.07.27 15:22:10 +05'30'

**(व. मुं. भरोसे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत** -

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
४) मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
७) आयुक्त, कामगार आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८) संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९) संचालक, बाष्पके संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०) सर्व प्रादेशिक कार्यालये, कामगार आयुक्तालय/औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय/बाष्पके संचालनालय
११) सर्व कार्यासन, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१२) निवड नस्ती.

## परिशिष्ट - अ

| क्र. | लोकसेवेचा तपशिल | लोकसेवा पुरविण्यासाठी विहित केलेली कालमर्यादा | पदनिर्देशित अधिकारी | प्रथम अपिलीय अधिकारी | व्दितीय अपिलीय अधिकारी |
|---|---|---|---|---|---|
| १ | मुंबई दुकाने आणि आस्थापना अधिनियम १९४८ अंतर्गत नोंदणी | ७ दिवस | दुकाने निरिक्षक | संबंधित जिल्हा सरकारी कामगार अधिकारी | संबंधित जिल्हा सहाय्यक कामगार आयुक्त |
| २ | मुंबई दुकाने आणि आस्थापना अधिनियम १९४८ अंतर्गत नोंदणीचे नुतनिकरण करणे | ७ दिवस | दुकाने निरिक्षक | संबंधित जिल्हा सरकारी कामगार अधिकारी | संबंधित जिल्हा सहाय्यक कामगार आयुक्त |
| ३ | कंत्राटी कामगार (नियमन आणि निर्मुलन) अधिनियम १९७० अंतर्गत मुख्य मालक नोंदणी | ७ दिवस | सहाय्यक कामगार आयुक्त | अपर कामगार आयुक्त / कामगार उप आयुक्त | कामगार आयुक्त |
| ४ | कंत्राटी कामगार (नियमन आणि निर्मुलन) अधिनियम १९७० अंतर्गत कंत्राटदारास अनुज्ञाप्ती देणे | ७ दिवस | सहाय्यक कामगार आयुक्त | अपर कामगार आयुक्त / कामगार उप आयुक्त | कामगार आयुक्त |
| ५ | कंत्राटी कामगार (नियमन आणि निर्मुलन) अधिनियम १९७० अंतर्गत कंत्राटदारास अनुज्ञाप्तीचे नुतनीकरण करणे | ७ दिवस | सहाय्यक कामगार आयुक्त | अपर कामगार आयुक्त / कामगार उप आयुक्त | कामगार आयुक्त |
| ६ | इमारत आणि इतर बांधकाम मजूर (नोकरीचे नियमन आणि शर्ती) अधिनियम १९९६ अतंर्गत आस्थापनांची नोंदणी | ७ दिवस | सहाय्यक कामगार आयुक्त | अपर कामगार आयुक्त / कामगार उप आयुक्त (प्रादेशिक विभाग प्रमुख) | कामगार आयुक्त |
| ७ | मोटार परिवहन कामगार अधिनियम १९६१ अंतर्गत नोंदणी | १५ दिवस | कामगार उप आयुक्त (ग्रा. वि.) | सह आयुक्त कामगार | कामगार आयुक्त |
| ८ | बिडी व सिगार (नोकरीच्या शर्ती) वर्कस अधिनियम १९६६ अंतर्गत औद्योगिक वस्तुंची नोंदणी | १५ दिवस | सरकारी कामगार अधिकारी | सहाय्यक कामगार आयुक्त | अपर आयुक्त कामगार / कामगार उप आयुक्त |

## परिशिष्ट – ब

| क्र. | लोकसेवेचा तपशिल | लोकसेवा पुरविण्यासाठी विहित केलेली कालमर्यादा | पदनिर्देशित अधिकारी | प्रथम अपिलीय अधिकारी | व्दितीय अपिलीय अधिकारी |
|---|---|---|---|---|---|
| १ | मालकी हक्काचे हस्तांतरण | ७ दिवस | निरीक्षण शाखेचा तांत्रिक अधिकारी / अधिक्षक | सह संचालक, बाष्पके, मुंबई / प्रादेशिक कार्यालये | संचालक, बाष्पके |
| २ | प्रमाणपत्राची नक्कल प्रत | ७ दिवस | निरीक्षण शाखेचा तांत्रिक अधिकारी / अधिक्षक | सह संचालक, बाष्पके, मुंबई / प्रादेशिक कार्यालये | संचालक, बाष्पके |